लियोनार्ड केसलर

# मिस्टर पाईन यांचं जांभुळकं घर.



मराठी अनुवादः फारूक एस. काझी

# मिस्टर पाईन यांचं जांभुळकं घर.



लियोनार्ड केसलर

मराठी अनुवाद: फारूक एस. काझी



मिस्टर पाईन वाईन स्ट्रीटवरील एका
छोट्याशा पांढऱ्या घरात राहत होते.

मिस्टर पाईन म्हणाले, “हे पांढरं घर ठीक आहे.

पण, वाईन स्ट्रीटवर पन्नासेक घरं तर पंढऱ्याच रंगांची आहेत

मग, मी कसं सांगू शकेन की, त्यातलं माझं घर कोणतं आहे?”





त्यांनी रस्त्याकडे वरून खालपर्यंत पाहून घेतलं.

"मला माहीत आहे."
मिस्टर पाईन म्हणाले
"मी माझ्या घराजवळ एक
झाड लावेन,
एक छोटंसं पाईनचं झाड.



मिस्टर पाईनच्या घरासमोर
पाईनचं झाड
तुम्ही पाहिलं का?
आणि मी आहे मिस्टर पाईन!"



त्यांनी ठरवलं, "मी असंच करेन."

आणि त्यांनी तसंच केलं.



मिस्टर गोल्ड, मिस्टर पाईन
यांच्या शेजारीच राहायचे.

“कित्ती सुंदर छोटंसं झाड!”
मिस्टर गोल्ड म्हणाले.



मिसेस ग्रीन मिस्टर
गोल्डच्या शेजारी राहत
होत्या.

“कित्ती सुंदर झाड आहे!”
मिसेस ग्रीन म्हणाल्या.



मिसेस ब्राऊन मिसेस ग्रीनच्या शेजारी राहत होत्या.

“कित्ती सुंदर झाड आहे!” मिसेस ब्राऊन म्हणाल्या.

दुसऱ्या दिवशी मिस्टर पाईन यांनी आपली खिडकी उघडली

त्यांना आपलं छोटंसं पाईनचं झाड पाहायचं होतं.

पण, ते पाहतात तर काय?



त्यांनी पन्नास घरं पाहिली

जी एका ओळीत उभी होती.

आणि प्रत्येक घराजवळ त्यांनी

एक छोटं पाईनचं झाड पाहिलं.

“अरे देवा!” मिस्टर पाईन

म्हणाले.





“आता मी कसं सांगणार,

यातलं माझं घर कोणतं आहे?’

त्यांनी पुन्हा रस्त्याकडे वरून खालपर्यंत पाहून घेतलं.



“मला माहीत आहे.” मिस्टर पाईन म्हणाले.

“माझ्या या छोट्या पाईन झाडाजवळ मी एक मोठं झुडूप लावेन.”



“हम्म

मोठं झुडूप. पाईनचं झाड

आणि मिस्टर पाईनचं घर

तुम्ही पाहिलं का?

आणि मी आहे मिस्टर पाईन!”

त्यांनी हे केलं:



आणि हे सुद्धा



“पाहा” मिस्टर पाईन म्हणाले.

“हां! आता हे एकदम व्यवस्थित वाटतंय.”

“किती सुंदर झुडूप आहे!”
मिस्टर गोल्ड म्हणाले.

“अरे ते कित्ती छान आहे!”
मिसेस ग्रीन म्हणाल्या.

“खूप खूप सुंदर!” मिसेस
ब्राऊन बोलल्या.







दुसऱ्या दिवशी मिस्टर पाईननी
आपली खिडकी उघडली
त्यांना आपलं छोट्याशा
पाईनच्या झाडाजवळचं
मोठं झुडूप पाहायचं होतं.
पण, ते पाहतात तर काय?

एका ओळीत पन्नास पांढरी घरं होती
पन्नास घरांजवळ छोटी झाडं होती,
सगळीच्या सगळी पाईनची
आणि सगळ्या झाडांच्या शेजारी
एक मोठं झुडूप!



“अरे देवा..!” मिस्टर पाईन हताशपणे म्हणाले.

“अरे, देवा!”  सगळी घरं पुन्हा एकदा एकसारखीच दिसू लागली.

मिस्टर पाईननी विचार केला आणि खूप विचार केला.

“मला माहितीये.”

मिस्टर पाईन म्हणाले, “मी आता घराला नवीन रंग देईन.”



मग त्यांनी विचार केला आणि खूप विचार केला.

“मला पाहू द्या.” ते म्हणाले.

“लाल? पिवळा? नारंगी? ना ना..

निळा? हिरवा? गुलाबी?..

मला विचार करू द्या.

मला माहीत आहे.

मी माझ्या घराला रंग देईन

जांभळा!”






मग ते रंग

खरेदीला गेले.

“मला रंग हवे आहेत.”

मिस्टर पाईन मिस्टर डॅशना म्हणाले.

“मला माझ्या घराला जांभळा रंग द्यायचा आहे.”






“जांभळा?” मिस्टर डॅशनी विचारलं.

“हो, जांभळा.”

“हिरवा रंग पण छानच दिसेल.” मिस्टर डॅशनी सुचवलं.

“नको.”

“लाल रंग पण काही वाईट नाही.” मिस्टर डॅशनी पुन्हा सुचवलं.

“नको!” मिस्टर पाईन उत्तरले.

“मग पांढरा ट्राय करून बघा.” मिस्टर डॅश म्हणाले.

“नक्को!! मला जांभळाच रंग हवा आहे.” मिस्टर पाईन जोर देत बोलले.

"जांभळा! मला वाटतं तुम्ही यावर पुन्हा एकदा विचार करावा.

बरं ठीक आहे,

तुम्हाला जांभळाच हवा आहे तर..

तुम्हाला रंगाचे एकूण नऊ डबे लागतील."
मिस्टर डॅश बोलले.




"मला काही ब्रशही लागतील."
मिस्टर पाईन बोलले.

आणि हे पण:

पुट्टी




आणि हे सुद्धा:




पॉलिश पेपर

मला रंग मिक्स करायला आणि ब्रश धुण्यासाठीही काहीतरी लागेल."

बादली




मिक्सर

थीनर

मिस्टर पाईन यांनी सगळं साहित्य
आपल्या ट्रकमध्ये भरलं
आणि ते वाईन स्ट्रीटवर आले.




त्यांनी आपली उंच शिडी इथं ठेवली.



त्यांनी आपली छोटी शिडी तिथं ठेवली.

“रंग देण्याआधी मला काही कामं करावी लागतील.”

मिस्टर पाईन म्हणाले.

“मला काहीतरी मिसळावं लागेल.

काही दुरुस्ती करावी लागेल.”



हे भरावं लागेल,






आणि हे स्वच्छ करावं लागेल.”

“रंग कालवून झाला. चला

आता रंग तयार झाला.

आता मला रंग देता येईल.”

मिस्टर पाईन शिडीवरून वर चाढले.

ब्रश छपाक छपाक चालू लागला.

छपाक, छपाक, छपाक





काही मुलं रस्त्यावर बेसबॉल खेळत होती.

मिस्टर पाईननी त्यांना पाहिलं नव्हतं.



त्यातल्या एका मुलाने जोरात चेंडू टोलवला.

चेंडू वर गेला

आणखी वर .. आणखी वर..

ती एक होम रन होती.

“लक्ष द्या मिस्टर पाईन

मिस्टर पाईन इकडं

पाहा..” मुलं ओरडली.

पण मिस्टर पाईनना ते

ऐकूच आलं नाही.



धप्पाक!!

तो चेंडू मिस्टर पाईन यांच्या

डोक्यावर येऊन आदळला.

धप्पाक!!



त्यांच्या हातातील ब्रश गळून पडला.

त्यांच्या हातातील बादली गळून पडली.

आणि मिस्टर पाईन पण खाली पडले.





“मला आणखी रंग आणावा लागेल.”,
मिस्टर पाईन म्हणाले.

ते पुन्हा एकदा शिडीवर चढले.

छपाक छपाक त्यांचा ब्रश चालू लागला.

छपाक,  छपाक,  छपाक



मग, मिसेस गोल्ड यांची मांजरी

शिडीखालून धावली.

मिस्टर पाईन यांचा कुत्रा छोट्या

मांजरीमागे धावला.

दोघे दोघे गोल गोल

धावत होते.

घुर्र!

म्याऊ, म्याऊ!

घुर्र!

म्याऊ, म्याऊ!



छोटी मांजरी चढली शिडीवर.

मिस्टर पाईन यांनी तिला
पाहिलंच नाही.

ते शिडीवरून खाली उतरताना

नेमका त्यांचा पाय पडला
मांजरीच्या पंजावर.



म्याऊ-म्याऊ!





मग काय, मांजरी पडली खाली.

ब्रश पण खाली.

शिडी पण खाली.

रंग पण सांडून गेला.

आणि मिस्टर पाईन पण सरळ खाली!



धप्पाक!



आता, मिस्टर पाईन
यांच्याकडे
होतं थोडं जांभूळकं गवत,
एक जांभूळकी मांजरी,
एक जांभूळकं कुत्रं,
एक जांभूळकी टोपी



आणि

एक जांभुळकं नाक!





“आता मला आणखी जांभळा
रंग आणावा लागेल.”

मिस्टर पाईन म्हणाले.

ते पुन्हा एकदा शिडीवर चढले.



छपाक, छपाक

मिस्टर पाईन तोवर रंग देत होते,

जोवर अख्खं घर जांभुळकं झालं
नाही!



“कित्ती सुंदर आहे हे जांभुळकं घर!”, मिसेस ग्रे म्हणाल्या.

“मीपण माझं घर असंच रंगवेन.”

वाईन स्ट्रीटवर मिस्टर पाईन यांचं

घर पाहायला गर्दी होऊ लागली.

कुणी कधीच असं

जांभळ्या रंगांचं घर पाहिलं नव्हतं.





"अरे नाही! नको नको ..!"
मिस्टर पाईन वैतागून म्हणाले.

"वाईन स्ट्रीटवर एकाचवेळी
पन्नास जांभुळकी घरं नकोत!!"

"पण, मी तर माझं घर गुलाबी रंगातच
रंगवेन." मिसेस ग्रे बोलल्या.

"मी तर पिवळाच देईन." मिसेस ग्रीन
म्हणाल्या.

"मी हिरवा निवडेन." मिसेस ब्राऊन
म्हणाल्या.

"मला तर लालच रंग आवडतो. मी
लालच रंग देईन." मिसेस व्हाईट बोलल्या.

"मी माझं घर पांढऱ्या रंगाचंच ठेवेन."
मिस्टर गोल्ड म्हणाले.



आता वाईन स्ट्रीटवर पन्नास घरं आहेत.

लाल घरं आहेत,

हिरवी घरं आहेत,

आणि करडी घरं आहेत,

पिवळी आणि गुलाबी घरं आहेत,

आणि पांढरी घरं पण आहेत.

पण, वाईन स्ट्रीटवर

एकच जांभुळकं घर आहे.








आणि ते ही मिस्टर पाईन यांचं!

जांभुळकं घर!

